भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम,१९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यासाठी, अभियोग मंजूरी आदेशावर स्वाक्षरी करण्यास सक्षम अधिकारी यांना प्राधिकृत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**क्रमांक :- अभियो-२०२२/प्र.क्र.२८ /नापु-१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १५ मे, २०२३

वाचा:- १. सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्र.अभियो-१३१२/प्र.क्र.३०/पुनर्बांधित-१/११-अ, दि.१२.२.२०१३.
२. सामान्य प्रशासन विभागाचे शासन परिपत्रक क्र. विचौअ-१६१९/प्र.क्र.४०/११-अ, दि.१४.०१.२०२१
३. सामान्य प्रशासन विभागाचे शासन परिपत्रक क्र. अभियो-१६२१/प्र.क्र.५४/११-अ, दि.२७.०१.२०२२
४. अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाचा क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.२२२/नापु-१५, दि.१२.१०.२०२२ चा शासन निर्णय.
५. अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाची सुधारीत विषयसूची क्र.नापुवि-१०२२/प्र.क्र.२३६/नापु-११, दि. ९.२.२०२३

-: **आदेश** :-

भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम,१९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यासाठी, अभियोग मंजूरी आदेशावर स्वाक्षरी करण्यास सक्षम अधिकारी यांना प्राधिकृत करणेबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.२.२०१३ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४ मधील “ड” येथील तरतुदीनुसार अभियोग दाखल करण्याच्या मंजूरी आदेशास सक्षम प्राधिकारी व विधी व न्याय विभाग यांची मान्यता प्राप्त झाल्यानंतर, शासन कार्यनियमावलीतील क्र.१३ मध्ये नमूद केल्यानुसार आदेशाचा मसुदा सक्षम प्राधिकारी यांच्या सहीने निर्गमित करावा अशी तरतूद आहे.

२. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१४.१.२०२१ च्या परिपत्रकान्वये, भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम,१९८८ अंतर्गत अभियोग दाखल करावयाचा असल्यास अभियोग मंजूरी

आदेशावर किमान उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास स्वाक्षरी करण्यासाठी प्राधिकृत करावयाच्या अधिकाऱ्याचे नाव व पदनामासहित प्राधिकृत करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

३. महाराष्ट्र शासन कार्यनियमावलीतील क्र. १३ मध्ये " राज्य शासनाचा प्रत्येक आदेश किंवा लेख यावर सचिव, अपर सचिव, सहसचिव, उप सचिव, अवर सचिव किंवा सहायक सचिव किंवा त्या बाबतीत ज्यास विशेष अधिकार प्रदान करण्यात आले आहेत असा इतर अधिकारी, याने सही केली पाहिजे, आणि अशी सही ही अशा आदेशाचे किंवा लेखाचे योग्य अधिप्रमाणन समजले जाईल" अशी तरतूद करण्यात आली आहे. सदर नियम भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद १६६ (Article १६६) द्वारा प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन तयार करण्यात आले आहेत.

४. या विभागाच्या दि.९.२.२०२३ रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या विषयसूचीनुसार, अभियोग दाखल मंजूरी करण्याबाबतचा विषय नापु-१३ या कार्यासनाकडे हस्तांतरीत करण्यात आल्यामुळे, या विभागातील नापु-१५ कार्यासनाकडून " उप सचिव व त्यावरील वरीष्ठ अधिकारी" ज्यांची वेतनश्रेणी एस-१४ व त्यावरील आहे, अशा अधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्यात आलेला दि.१२.१०.२०२२ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन, अभियोग दाखल करण्यास मंजूरी देण्याबाबतच्या मंजूरी आदेशावर स्वाक्षरी करण्यासाठी खालील अधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त सर्व आस्थापनांमधील "गट-अ" व "गट-ब" संवर्गाच्या अधिकारी यांच्याविरुध्द अभियोग दाखल करणे आवश्यक आहे, अशा सर्व "गट-अ" व "गट-ब" संवर्गाच्या अधिकारी यांच्याविरुध्द भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम, १९८८ अंतर्गत लाचलुचपत प्रकरणी अभियोग दाखल करण्याबाबत शासनास प्राप्त झालेल्या प्रस्तावावर, शासनाची (सक्षम प्राधिकारी) तसेच विधी व न्याय विभागाची मान्यता प्राप्त झाल्यानंतर, मा.न्यायालयात अभियोग दाखल करण्यास मंजूरी देण्याबाबतच्या मंजूरी आदेशावर स्वाक्षरी करण्यासाठी **"श्री.तातोबा मा. कोळेकर, सह सचिव (नापु-१३) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई"** यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

तसेच संदर्भ क्र.३ मधील मार्गदर्शक सूचनांचे पालन, करण्याच्या सूचना, याद्वारे देण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१५१७२५३४९३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY BALKRISHNA WAGHMARE

Digitally signed by VIJAY BALKRISHNA WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT,
2.5.4.20=f732949950f551f77488d97adf63b1be835f3a8db6f43554c249546fe680b629, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=46023E62FC39A04680C22E8800D4B44643940A8C497578686120DE5067362274, cn=VIJAY BALKRISHNA WAGHMARE
Date: 2023.05.15 17:26:08 +05'30'

**( विजय वाघमारे )**
**शासनाचे सचिव**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
४. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सर्व विभागीय आयुक्त,
६. सर्व जिल्हाधिकारी.
७. नियंत्रक,शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई
८. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई.
९. सर्व उपायुक्त (पुरवठा).
१०. संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
११. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१३. सचिव, राज्य अन्न आयोग, पहिला मजला,ठाकरसी हाऊस, जे.एन.हरदीया रोड, बेलार्ड इस्टेट, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
१४. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी.
१५. सामान्य प्रशासन विभाग (कार्या-११), मंत्रालय, मुंबई.
१६. महसूल व वन विभाग (ई-४/ई-९), मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (नापु-१३).